राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत बी.टी.आय (द्रव) किंवा बी.टी.आय (पावडर) खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१६/प्र.क्र. ४०१/आरोग्य-८**

नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१
दिनांक: १८ नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ-**

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/साथरोग कक्ष-६/BTI Liquid & Powder खरेदी/प्रशासकीय मान्यता/न.क्र. ५७/१८६१-६३ / २०१६, दिनांक १५.१०.२०१६

२) सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप,हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे यांचे पत्र क्रमांक ससंआसे/किजरो/जाहीर निविदा/ BTI Liquid & Powder प्रस्ताव भांडार-३/न.क्र./३०७१३-१४/१६, दिनांक ०६.१०.२०१६

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत डास नियंत्रणासाठी डासोत्पत्ती स्थानावर दर आठवडयास बी.टी. आय. या अळीनाशकाची नियमीत फवारणी करण्यात येते. सदरहू फवारणीसाठी ९,६०० लिटर बी.टी.आय. (द्रव) **किंवा** १२,४०६ कि.ग्रॅ. बी.टी.आय. (पावडर) ची खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भीय पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार बी.टी.आय. या अळीनाशकाची खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भीय दिनांक १५.१०.२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने राष्ट्रीय किटकजन्य रोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत एकूण ९,६०० लिटर बी.टी.आय. (द्रव) **किंवा** १२,४०६ कि.ग्रॅ. बी.टी.आय. (पावडर) ची खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रिया करण्यास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) बी.टी.आय. (द्रव) / बी.टी.आय. (पावडर) ची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी.

२) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- केंद्र पुरस्कृत योजना- (राज्य हिस्सा)- (०१) (४७) राष्ट्रीय हिवताप निर्मूलन कार्यक्रम- २१ पुरवठा व सामग्री (२२१० ५१५७)" तसेच "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- केंद्र पुरस्कृत योजना- (राज्य हिस्सा)- (०१) (४८) राष्ट्रीय हत्तीरोग नियंत्रण कार्यक्रम- २१ पुरवठा व सामग्री (२२१० ५१६६)"या लेखाशिर्षांअंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३) बी.टी.आय. (द्रव)/ बी.टी.आय. (पावडर) चे तांत्रिक विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी व त्यानंतरच या बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रसिध्द करण्यात यावी.

४) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ३० ऑक्टोंबर, २०१५ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२,दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

६) निविदा प्रक्रिया पुर्ण झाल्यांनतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११८१४०२२७२९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Sumant Kulkarni

Digitally signed by Ganesh Sumant Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ganesh Sumant Kulkarni
Date: 2016.11.18 16:49:01 +05'30'

( ग.सु.कुलकर्णी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा ( हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११) निवडनस्ती (आरोग्य-८)